MPP018

ग्रंथालयातील पुस्तके/ग्रंथ/नियतकालिके
यांच्या भांडार पडताळणीबाबत.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग

शासन निर्णय, क्रमांक मआक-१०८८/प्र. क्र. ३०/विनियम,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २ डिसेंबर १९९१

**वाचावे.**—(१) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक डीएटी-११६७/१४४-सी/६८/१२, दिनांक ३० जुलै १९६८.
(२) शासन अधिसूचना, वित्त विभाग, क्रमांक एफएनआर-१०८४/सीआर-१०९३/जीईएन-५, दिनांक १७ सप्टेंबर १९८५.

**निर्णय.**—वित्त विभागाच्या दिनांक ३० जुलै १९६८ च्या उपरोक्त शासन निर्णयानुसार ग्रंथालयातील पुस्तके, ग्रंथ, नियतकालिके, प्रकाशने, यांची भांडार पडताळणी लेखा व कोषागारे संचालनालयाच्या भांडार पडताळणी शाखेकडून करण्यात यावी, असे आदेश निर्गमित करण्यात आलेले होते. तसेच वित्त विभागाच्या दिनांक १७ सप्टेंबर १९८५ च्या उपरोक्त शासकीय अधिसूचनेनुसार केलेली दुरुस्ती विचारात घेता "भांडार" या संज्ञेत "पुस्तके, प्रकाशने, नियतकालिके" यांचा अंतर्भाव होत नाही, असे आदेश निर्गमित करण्यात आलेले आहेत. प्रशासकीय विभागाच्या तसेच त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली असलेल्या निरनिराळ्या विभागांमधील/कार्यालयांमधील मोठ्या ग्रंथालयातील पुस्तकांची, ग्रंथांची, नियतकालिकांची भांडार पडताळणी इतःपर कुणी करावी याबाबतचा प्रश्न काही काळ शासनाच्या विचाराधीन होता. याचा पुनर्विचार करून शासन आता असे आदेश देत आहे की, शासकीय विभागाच्या/कार्यालयाच्या ग्रंथालयातील पुस्तकांची ग्रंथांची, नियतकालिकांची भांडार पडताळणी, जी पूर्वी लेखा व कोषागारे संचालनालयाच्या भांडार पडताळणी शाखेकडून करण्यात येत होती, ती पद्धत तात्काळ बंद करण्यात यावी.

२. शासकीय विभागांच्या/कार्यालयांच्या ग्रंथालयांतील पुस्तकांची, ग्रंथांची, नियतकालिकांची भांडार पडताळणी खाली नमूद केलेल्या वेळापत्रकानुसार विभाग प्रमुखांनी (किंवा विभाग प्रमुखांनी प्राधिकृत केलेल्या कार्यालय प्रमुखांनी) किंवा संबंधित प्रादेशिक कार्यालय प्रमुखांनी करावी.

(१) १० हजारपर्यंत ग्रंथ, पुस्तके (नियतकालिक वगळून) असलेल्या ग्रंथालयांची तपासणी वर्षातून एकदा करण्यात यावी.
(२) १० हजार ते २५ हजार ग्रंथ किंवा पुस्तके (नियतकालिके वगळून) असलेल्या ग्रंथालयांची तपासणी २ वर्षांतून एकदा करण्यात यावी.
(३) २५ हजार ते ५० हजार ग्रंथ, पुस्तके (नियतकालिके वगळून) असलेल्या ग्रंथालयांची तपासणी ३ वर्षांतून एकदा करण्यात यावी.

३. वर नमूद केलेल्या नियतकालिके तपासणी खेरीज दरवर्षी एकदा अचानक चाचणी तपासणी (सरप्राईज स्टेट चेक) सुद्धा संबंधित प्राधिकाऱ्याने करावी. नियकालिक तपासणीचा अहवाल तसेच अचानक चाचणी तपासणीचा अहवाल संबंधित प्राधिकाऱ्यांनी व संबंधित विभाग प्रमुखांनी प्रशासकीय विभागाकडे तपासणी केलेल्या तारखेपासून १ महिन्याच्या आत पाठवावा. निरनिराळ्या शासकीय विभागाच्या कार्यालयातील ग्रंथालयांची नियतकालिक तपासणी तसेच अचानक चाचणी तपासणी करणारा प्राधिकारी कोण राहील यासंबंधी संचालक, लेखा व कोषागार, महाराष्ट्र राज्य, मुंबई आणि संबंधित महालेखापाल यांना लेखी कळविण्याची दक्षता घेण्यात यावी.

४. निरनिराळ्या शासकीय विभागांतील/कार्यालयांतील पुस्तकांच्या, ग्रंथांच्या, नियतकालिकांच्या निर्लेखनाच्या संदर्भात खाली नमूद केल्याप्रमाणे अधिकार प्रदान करण्यात येत आहेत :—

| | |
|---|---|
| (१) प्रशासकीय विभाग .. .. | .. पूर्ण अधिकार. |
| (२) विभाग प्रमुख .. .. | .. रु. १,००० पर्यंत प्रतिवर्षी. |
| (३) प्रादेशिक कार्यालय प्रमुख .. | .. रु. ५०० पर्यंत प्रतिवर्षी. |
| (४) कार्यालय प्रमुख .. .. | .. रु. २५० पर्यंत प्रतिवर्षी. |

५. वरील अधिकार प्रदानासंबंधीच्या अटी व शर्ती खालीलप्रमाणे राहतील :—

(१) रु. १०० पेक्षा जास्त मूल्य असलेली पुस्तके/ग्रंथ हरवल्यास आवश्यक ती चौकशी करून त्यासंबंधीची जबाबदारी निश्चित करून वसुलीबाबत आवश्यक ती कार्यवाही करण्यात यावी.

(२) कालबाह्य/निरुपयोगी/खराब झालेली पुस्तके/ग्रंथ कार्यालयाचे हित लक्षात घेऊन रद्दबातल करण्यासाठी/ग्रंथालयाच्या नोंदवहीवरून काढून टाकण्यासाठी किंवा अन्य तऱ्हेने विल्हेवाट लावण्यासाठी त्या त्या शासकीय विभागातील/कार्यालयातील तीन जबाबदार सभासदांची एक समिती नेमण्यात यावी व सदर समितीने दिलेल्या निर्णयाप्रमाणे आवश्यक ती कार्यवाही करावी. अशा प्रकारची समिती संबंधित विभाग प्रमुखांनी/कार्यालय प्रमुखांनी दरवर्षी नेमावी.

(३) ज्या शासकीय ग्रंथालयांची नियतकाल तपासणी प्रतिवर्षी होणे आवश्यक नाही अशा ग्रंथालयातील पुस्तकांची, नियतकालिक तपासणी झाली नसली तरीही अचानक चाचणी तपासणी झाल्यानंतर अशा ग्रंथालयातील निर्लेखनायोग्य पुस्तकांची/ग्रंथांची विल्हेवाट विहित पद्धतीनुसार लावण्यात यावी.

६. महाराष्ट्र आकस्मिक खर्च अधिनियमांमध्ये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-१ मध्ये आवश्यक त्या सुधारणा यथावकाश करण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

पु. क. सबाई,
अवर सचिव, वित्त विभाग.

एच २५८६ (१३,०१०—१२-९१)

प्रत :—

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई (८० प्रती),

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर (६० प्रती).

महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई (८० प्रती),

महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर (६० प्रती),

संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,

मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,

उप संचालक, लेखा व कोषागारे, पुणे/नाशिक/औरंगाबाद/नागपूर/अमरावती,

उपमुख्य लेखापरीक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/नागपूर/अमरावती,

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (४० प्रती).

निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई (१० प्रती),

मंत्रालयातील सर्व प्रशासकीय विभाग,

मंत्रालयाच्या सर्व प्रशासकीय विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/प्रादेशिक कार्यालय प्रमुख/कार्यालय प्रमुख आणि संस्थांचे प्रमुख.

सचिव, शिक्षण व सेवायोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

त्यांना विनंती करण्यात येते की, महाविद्यालये व इतर संस्थांच्या प्रमुखांना योग्य त्या सूचना त्या विभागाने द्याव्यात.

राज्यपालांचे सचिव,

मुख्य मंत्र्यांचे सचिव,

सर्व मंत्री, यांचे खाजगी सचिव,

राज्य मंत्री, यांचे खाजगी सचिव,

उप सचिव (प्रशासन), वित्त विभाग,

ग्रंथपाल, वित्त विभाग.

निवड नस्ती, विनियम,

वि. अ. नि. १९७८ भाग-१ सुधारणा संग्रह/विनियम,

महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम सुधारणा संग्रह/विनियम,

सर्व विभागीय आयुक्त,

सर्व जिल्हाधिकारी,

*प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई.

*प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई.

*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

उप संचालक, लेखा व कोषागारे (भांडार पडताळणी) लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई.

(* पत्राने).